**आशियाई विकास बँक सहाय्यित कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम प्रकल्पास (AIDIP) सन २०१४-१५ करीता रु.२७० लाख निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बासप्र-१११४/प्र.क्र.१९४/२१-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: १९ जानेवारी, २०१५.

वाचा —

१) **शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृबास-२००७/ प्र.क्र.४५२/११-स, दि.१६.४.२००८.**

२) **शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.बासप्र-२००८/ प्र.क्र.४६/२१-स, दि.२९.१०.२०१०**

**प्रकल्प संचालक (पीएमयु),AIDIP प्रकल्प, पुणे यांचे पत्र क्र.एआयडीआयपी/ बजेट-१४-१५/६०९/२०१४, दि.२४.११.२०१४**

प्रस्तावना —

आशियाई विकास बँकेच्या सहकार्याने राज्यामध्ये "कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम (AIDIP) प्रकल्प" राबविण्यात येत असून या प्रकल्पास शासनाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.२९.१०.२०१० अन्वये मान्यता प्रदान केलेली आहे.

या प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे येथे प्रकल्प व्यवस्थापन कक्षाची स्थापना करण्यात आली असून तेथे प्रतिनियुक्तीने अधिकारी व कर्मचारी यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र.३ अन्वये प्रकल्प व्यवस्थापन कार्यालयामार्फत सन २०१४-१५ मध्ये पायाभूत सुविधा उभारण्याकरीता प्रकल्पासाठी लागणाऱ्या जागांचे भाडेपट्टा करार (Lease Deed) करणे, कन्सलटंट फी, जाहिरात खर्च, भांडवली खर्च, आस्थापना खर्च, प्रशासकीय व कार्यालयीन खर्च त्याचप्रमाणे प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करणे इ.कामांकरीता रु. २७० लाख निधी उपलब्ध करुन देण्याबाबत प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय—**

आशियाई विकास बँक सहाय्यित कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रमास सन २०१४-१५ करीता राज्य व बाहय हिश्श्यामधून रु.२७० लाख (रुपये दोन कोटी सत्तर लाख फक्त) निधी

वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत असून तो पुढील लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येत आहे-.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | मागणी क्रमांक व्ही-३<br>४४३५-इतर कृषि विषयक कार्यक्रमावरील भांडवली खर्च<br>(०१), पणन आणि गुणवत्ता नियंत्रण<br>(१९९), इतर अशासकीय संस्थांमधील गुंतवणुका<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प<br>(०१)(०१) आशियाई विकास बँक सहाय्यित कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक प्रकल्प<br>(राज्य योजना) (राज्य हिस्सा)<br>(४४३५ ००१२)<br>५४-गुंतवणुका | १३५.००<br>(रुपये एक कोटी पस्तीस लाख फक्त) |
| २ | मागणी क्रमांक व्ही-३<br>४४३५-इतर कृषि विषयक कार्यक्रमावरील भांडवली खर्च<br>(०१), पणन आणि गुणवत्ता नियंत्रण<br>(१९९), इतर अशासकीय संस्थांमधील गुंतवणुका<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प<br>(०१)(०२) आशियाई विकास बँक सहाय्यित कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक प्रकल्प<br>(राज्य योजना) (बाहय हिस्सा)<br>(४४३५ ००२१)<br>५४-गुंतवणुका | १३५.००<br>(रुपये एक कोटी पस्तीस लाख फक्त) |
| | **एकूण** | **२७०.००<br>(रुपये दोन कोटी सत्तर लाख फक्त)** |

२. सदर रु.२७०.०० लाख निधी (अक्षरी रुपये दोन कोटी सत्तर लाख फक्त) R.T.G.S. सुविधेव्दारे प्रकल्पाच्या बँक खात्यामध्ये जमा करावा. सदर प्रकल्पाच्या बँक खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे -

बँकेचे नांव : बँक ऑफ महाराष्ट्र, मार्केट यार्ड शाखा, गुलटेकडी, पुणे- ३७.

खात्याचे वर्णन : Agribusiness Infrastructure Development Investment Programme (AIDIP)

खाते क्रमांक : ६००६३७९३८४९

IFS Code : MAHB ०००११४०

३. सदर निधी वितरणाकरीता **श्री.रा.स.अटक, उपसचिव,** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना **नियंत्रण अधिकारी** म्हणून व **श्रीमती अ.अ.चुरी , कार्यासन अधिकारी,** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना **आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत प्रकल्प संचालक, कृषि-व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम प्रकल्प, पुणे यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

५. हे आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १/१५/व्यय-२, दि.१९.१.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११९१५११०९४००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Corporation marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Baburao Tumbare
Date: 2015.01.19 15:20:47 +05'30'

**( सु. बा. तुंबारे )**
**अवर सचिव**

**प्रति,**

१. मा.मंत्री (पणन), मंत्रालय, मुंबई

२. मा.राज्यमंत्री (पणन) मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/(कृषि व पणन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई

४. प्रकल्प संचालक, कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम प्रकल्प, मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे

५. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई

६. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, नागपूर

७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, ५वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर,मुंबई ३२.

८. निवासी लेखापरिक्षण अधिकारी, मुंबई

९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१०.वित्त विभाग (व्यय-२/शासन हमी/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

११.कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा/२२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

१२.निवड नस्ती